“मुख्यमंत्री वयोश्री योजना” या
योजनेतील सुधारणांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- ज्येष्ठना-२०२२/प्र.क्र.३४४/सामासु**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२
दिनांक :- १९ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :** १) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- ज्येष्ठना २०२२ / प्र.क्र.३४४ /सामासु, दि. ०६ फेब्रुवारी, २०२४.
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:- ज्येष्ठना २०२२ / प्र.क्र.३४४ /सामासु, दि.११ मार्च, २०२४.
३) आयुक्त समाजकल्याण, पुणे यांचे पत्र जावक क्र.सकआ/मावक/ज्येष्ठना/मुवयो/ २०२३-२४/का-१२/२११ दि.१५ फेब्रुवारी, २०२४
४) आयुक्त समाजकल्याण, पुणे यांचे पत्र जावक क्र.सकआ/मावक/ज्येष्ठना/मुवयो/ २०२३-२४/का-१२/४२३ दि.३१ मार्च, २०२४
५) आयुक्त समाजकल्याण, पुणे यांचे पत्र जावक क्र.सकआ/मावक/ज्येष्ठना/मुवयो/ २०२४-२५/का-१२/९२८ दि.१२ ऑगस्ट, २०२४

**प्रस्तावना:-**

राज्यातील ६५ वर्षे वय व त्यावरील ज्येष्ठ नागरिकांना त्यांच्या दैनंदिन जीवनात सामान्य स्थितीत जगण्यासाठी आणि त्यांना वयोमानपरत्वे येणाऱ्या अपंगत्व, अशक्तपणा यावर उपाययोजना करण्यासाठी आवश्यक सहाय्य साधने/उपकरणे खरेदी करणेकरिता तसेच मनःस्वास्थ केंद्र, योगोपचार केंद्र इ. द्वारे त्यांचे मानसिक स्वास्थ अबाधित ठेवण्यासाठी राज्यात “मुख्यमंत्री वयोश्री योजना” राबविण्यास मा.मंत्रिमंडळाने दि. ०५ फेब्रुवारी, २०२४ च्या बैठकीमध्ये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार मुख्यमंत्री वयोश्री योजना सुरु करण्यास संदर्भ क्र. १ येथील दि.०६ फेब्रुवारी, २०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्याचप्रमाणे सदर योजनेकरिता नवीन स्वतंत्र पोर्टल कार्यान्वित होईपर्यंत या योजनेअंतर्गत निधीचे वितरण पात्र लाभार्थ्यांच्या वैयक्तिक आधार संलग्न बँकेच्या बचत खात्यात एकवेळ एकरकमी ऑनलाईन पद्धतीने करण्याऐवजी निधीचे वितरण पात्र लाभार्थ्यांना थेट धनादेशाद्वारे एकवेळ एकरकमी रुपये ३०००/- च्या मर्यादेत ऑफलाईन पद्धतीने वितरीत करण्यास संदर्भ क्र. २ येथील दि. ११ मार्च, २०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी संदर्भाधीन दि. १५ फेब्रुवारी,२०२४, दि. ३१ मार्च, २०२४ आणि दि.१२ ऑगस्ट, २०२४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून संदर्भाधीन दि. ०६ फेब्रुवारी, २०२४ व दि. ११ मार्च, २०२४ च्या शासन निर्णयामधील नमूद काही निकषामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने **"मुख्यमंत्री वयोश्री योजना"** या योजनेच्या निकषांमध्ये अंशतः सुधारणा करण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

**"मुख्यमंत्री वयोश्री योजना"** या योजनेच्या संदर्भाधीन दि. ०६ फेब्रुवारी, २०२४ व दि. ११ मार्च, २०२४ रोजीच्या शासन निर्णयामध्ये पुढीलप्रमाणे अंशतः सुधारणा करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | शासन निर्णय दि. ०६ फेब्रुवारी, २०२४ मधील नमूद निकष | सुधारीत निकष |
|---|---|---|
| १. | **५.** लाभार्थ्यांची तपासणी, प्रवास, अल्पोपहार, कार्यालयीन खर्च, पात्र लाभार्थी यांची नोंदणी, दस्ताऐवज हाताळणी, कागदपत्र तपासणी करुन त्यांना थेट लाभ (D.B.T.) द्वारे वितरीत करणे. तसेच लाभार्थ्यास लाभ प्रमाणपत्र वाटप करणे करिता प्रती लाभार्थी रु.२००/- अंदाजे खर्च अपेक्षित आहे. | **५.** लाभार्थ्यांची तपासणी, प्रवास, अल्पोपहार, कार्यालयीन खर्च, पात्र लाभार्थी यांची नोंदणी, दस्ताऐवज हाताळणी, कागदपत्र तपासणी करुन त्यांना थेट लाभ हस्तांतरण (D.B.T.) द्वारे वितरीत करणे. |
| २. | **६. योजनेची अंमलबजावणी :-**<br>(i) ज्येष्ठ नागरिकांना आवश्यक सहाय्य व विशेष आर्थिक सहाय्य अनुदान थेट लाभ वितरण (D.B.T.) प्रणालीद्वारे अदा करण्याकरिता सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,मुंबई आयुक्त, समाजकल्याण विभाग, पुणे आणि जिल्हा स्तरावरील अंमलबजावणी समिती यांचा सहभाग असेल | **६. योजनेची अंमलबजावणी :-**<br>(i) ज्येष्ठ नागरिकांना आवश्यक सहाय्य व विशेष आर्थिक सहाय्य अनुदान थेट लाभ वितरण (D.B.T.) प्रणालीद्वारे अदा करण्याकरिता आयुक्त, समाजकल्याण, पुणे हे नियंत्रण अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी (DDO) असतील. |
| ३. | **७. राज्य नोडल एजन्सी /यंत्रणा :-**<br>प्रस्तुत योजनेसाठी लाभार्थ्यांची निवड करणे, लाभार्थ्यांकडून आवश्यक कागदपत्रांची तपासणी करणे, लाभार्थ्यांचे आधार क्रमांक, बँक खाते यांची माहिती गोळा करणे इ. कामे नोडल एजन्सी/केंद्रीय सामाजिक उपक्रम संस्था (CPSU) यांच्या माध्यमातून आयुक्त, समाजकल्याण पुणे यांच्याद्वारे पार पाडण्यात येईल.<br>**७. ब) जिल्हा स्तर :-**<br>**सदस्य सचिव - सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण/जिल्हा समाजकल्याण अधिकारी** | **७. राज्य नोडल एजन्सी /यंत्रणा :-**<br>प्रस्तुत योजनेसाठी लाभार्थ्यांची निवड करणे, लाभार्थ्यांकडून आवश्यक कागदपत्रांची तपासणी करणे, लाभार्थ्यांचे आधार क्रमांक , बँक खाते यांची माहिती गोळा करणे इ. कामे जिल्हाधिकारी/आयुक्त, महानगरपालिका यांच्या अध्यक्षतेखालील समितीद्वारे पार पाडण्यात येतील.<br>**७. ब) जिल्हा स्तर :-**<br>**सदस्य सचिव - सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण** |

| | | |
|---|---|---|
| ४. | **८. लाभार्थ्यांच्या पात्रतेचे निकष :-**<br>**अ)** सदर योजनेतंर्गत लाभार्थी व्यक्ती राज्यातील ज्येष्ठ नागरिक (ज्या नागरिकांनी दि.३१.१२.२०२३ अखेर पर्यन्त वयाची ६५ वर्षे पूर्ण केली असतील, असे नागरिक पात्र समजण्यात येतील). ज्या व्यक्तींचे वय ६५ वर्षे आणि त्याहून अधिक आहे त्या व्यक्तींकडे आधार कार्ड असणे आवश्यक आहे किंवा आधार कार्डसाठी अर्ज केलेला असावा आणि आधार नोंदणीची पावती असणे आवश्यक आहे. जर लाभार्थ्यांकडे आधार कार्ड नसेल, आणि स्वतंत्र ओळख दस्तऐवज असतील, तर ते ओळख पटविण्यासाठी स्वीकारार्ह असेल.<br>**उ)** पात्र लाभार्थ्यांच्या बँकेच्या वैयक्तीक आधार संलग्न बचत खात्यात रु. ३०००/- थेट लाभ वितरण प्रणालीद्वारे वितरीत झाल्यावर सदर योजनेअंतर्गत विहीत केलेली उपकरणे खरेदी केल्याचे तसेच मनःस्वास्थ केंद्राद्वारे प्रशिक्षण घेतल्याचे लाभार्थ्यांचे देयक (Invoice) प्रमाणपत्र ३० दिवसांच्या आत संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांच्याकडून प्रमाणित करुन संबंधित केंद्रीय सामाजिक उपक्रम (CPSU) संस्थेमार्फत विकसित पोर्टलवर ३० दिवसांच्या आत अपलोड करणे आवश्यक राहील. अन्यथा लाभार्थ्यांकडून सदर रक्कम वसूल करण्यात येईल.<br>**योजनेसाठी आवश्यक कागदपत्रे :-**<br>२ .राष्ट्रीयकृत बँकेचे बँक पासबुक झेरॉक्स | **८. लाभार्थ्यांच्या पात्रतेचे निकष :-**<br>**अ)** सदर योजनेतंर्गत लाभार्थी व्यक्ती राज्यातील ज्येष्ठ नागरिक (ज्या नागरिकांनी दि.३१.१२.२०२३ अखेर पर्यन्त वयाची ६५ वर्षे पूर्ण केली असतील, असे नागरिक पात्र समजण्यात येतील). ज्या व्यक्तींचे वय ६५ वर्षे आणि त्याहून अधिक आहे त्या व्यक्तींकडे आधार कार्ड असणे आवश्यक आहे.<br>**उ)** पात्र लाभार्थ्यांच्या बँकेच्या वैयक्तीक आधार संलग्न बचत खात्यात रु. ३०००/- थेट लाभ वितरण प्रणालीद्वारे वितरीत झाल्यावर सदर योजनेअंतर्गत विहीत केलेली उपकरणे खरेदी केल्याचे तसेच मनःस्वास्थ केंद्राद्वारे प्रशिक्षण घेतल्याचे लाभार्थ्यांचे देयक (Invoice) व प्रमाणपत्र ३० दिवसांच्या आत संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांनी प्रमाणित करुन पोर्टलवर ६० दिवसांच्या आत अपलोड करणे आवश्यक राहील. अन्यथा लाभार्थ्यांकडून सदर रक्कम वसूल करण्यात येईल.<br>**योजनेसाठी आवश्यक कागदपत्रे :-**<br>२ .कोअर बँकीग सुविधा असलेल्या बँकेचे आधार संलग्न बचत खाते पासबुक झेरॉक्स |
| ५. | **११ . नियंत्रण आणि मूल्यमापन-:**<br>सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाद्वारे या योजनेचे नियंत्रण केले जाईल. विभागाद्वारे या कार्यक्रमाचे मूल्यमापन अंमलबजावणीच्या एक वर्षानंतर आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचेमार्फत केले जाईल.<br>अर्ज प्रक्रिया, छाननी, वितरण पद्धती इ. औपचारिकता अंमलबजावणी एजन्सीव्दारे निश्चित केल्या जातील. | **११ . नियंत्रण आणि मूल्यमापन-:**<br>सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाद्वारे या योजनेचे नियंत्रण केले जाईल. विभागाद्वारे या कार्यक्रमाचे मूल्यमापन अंमलबजावणीच्या एक वर्षानंतर आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचेमार्फत केले जाईल. |

<table>
<tr>
<td>६.</td>
<td>
१२ . आर्थिक भार :-<br>
(ब) नोडल एजन्सी खर्च :-<br>
प्रती लाभार्थी खर्च रुपये २००/- प्रमाणे (१५,००,००० x २०० = रु.३०,००,००,०००/) (अक्षरी रुपये तीस कोटी फक्त) इतका कमाल अंदाजित खर्च असेल.<br>
अंमलबजावणी संस्था, नोडल एजन्सी / केंद्रीय सामाजिक उपक्रम संस्था (CPSU) यांच्याद्वारे लाभार्थी संबंधीत सर्व कामे व थेट लाभ वितरण (D.B.T.) प्रक्रियाद्वारे पार पाडून होईल.<br>
(क) शिबीर आयोजन -: सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत प्राथमिक आरोग्य केंद्र, उपकेंद्र, उपजिल्हा रुग्णालय यांच्यामार्फत आरोग्य यंत्रणेचे जाळे राज्याच्या कानाकोपऱ्यात पसरलेले आहे. असंसर्गजन्य रोग सर्वेक्षण (पॉप्युलेशन बेस्ड स्क्रिनिंग) व माझे कुटुंब माझी जबाबदारी अभियानाअंतर्गत ज्येष्ठ नागरिकांचे सर्वेक्षण व स्क्रिनिंग घरोघरी जाऊन करण्यात येते. अशाप्रकारे सार्वजनिक आरोग्य विभागाच्या यंत्रणेमार्फत त्या विभागाच्या सर्वेक्षणासोबत या योजनेच्या लाभार्थ्यांची तपासणी करण्यात येईल. सदर योजनेकरिता प्रस्तावित खर्च पुढीलप्रमाणे : -<br>
<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>तपशील</th><th>प्रस्तावित खर्च (रूपये लाखात)</th></tr>
<tr><td>१</td><td>थेट लाभ वितरण खर्च (१५ लाख लाभार्थी यांना प्रति रु. ३ हजार प्रमाणे)</td><td>४५०००.००</td></tr>
<tr><td>२</td><td>नोडल एजन्सी खर्च</td><td>३०००.००</td></tr>
<tr><td>३</td><td>शिबीर आयोजन खर्च</td><td>००.००</td></tr>
<tr><td></td><td>एकूण</td><td>४८०००.००</td></tr>
</table>
(अक्षरी रक्कम रू.चारशे ऐशी कोटी फक्त)
</td>
<td>
१२ . आर्थिक भार :-<br>
(ब) नोडल एजन्सी खर्च :-<br>
सदर परिच्छेद वगळण्यात येत आहे.<br>
(क) शिबीर आयोजन -: सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत प्राथमिक आरोग्य केंद्र, उपकेंद्र, उपजिल्हा रुग्णालय यांच्यामार्फत आरोग्य यंत्रणेचे जाळे राज्याच्या कानाकोपऱ्यात पसरलेले आहे. असंसर्गजन्य रोग सर्वेक्षण (पॉप्युलेशन बेस्ड स्क्रिनिंग) व माझे कुटुंब माझी जबाबदारी अभियाना अंतर्गत ज्येष्ठ नागरिकांचे सर्वेक्षण व स्क्रिनिंग घरोघरी जाऊन करण्यात येते. अशाप्रकारे सार्वजनिक आरोग्य विभागाच्या यंत्रणेमार्फत त्या विभागाच्या सर्वेक्षणासोबत या योजनेच्या लाभार्थ्यांची तपासणी करण्यात येईल. सदर योजनेकरिता प्रस्तावित खर्च पुढीलप्रमाणे -<br>
<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>तपशील</th><th>प्रस्तावित खर्च (रूपये लाखात)</th></tr>
<tr><td>१</td><td>थेट लाभ वितरण खर्च (१५ लाख लाभार्थी यांना प्रति रु. ३ हजार प्रमाणे)</td><td>४५०००.००</td></tr>
<tr><td>२.</td><td>शिबीर आयोजन खर्च</td><td>००.००</td></tr>
<tr><td></td><td>एकूण</td><td>४५०००.००</td></tr>
</table>
(अक्षरी रक्कम रू.चारशे पन्नास कोटी फक्त)
</td>
</tr>
</table>

<table>
<tr><td>७.</td><td>परिशिष्ट -१<br>मार्गदर्शक तत्वे :-<br>(i) नोंदणीकृत लाभार्थ्यांची कागदपत्रे तपासणी, आधार प्रमाणीकरण, हमीपत्र, बँक लिंकेज इत्यादी तपासून शिबिराकरिता नेमून दिलेल्या प्राधिकृत अधिकाऱ्यांमार्फत प्रमाणित करून घेण्यात येईल व सदरील डाटा ऑनलाइन पद्धतीने व ऑफलाईन पद्धतीने जतन करण्यात येईल.<br>(ii) मूल्यमापन पूर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांना E-Token प्रदान करण्यात येईल. तसेच ऑफलाईन पद्धती करिता नोंदणी पावती प्रदान करण्यात येईल.<br>(iii) जिल्हा / महापालिका स्तरावरील मूल्यमापन कार्य पूर्ण पार पाडल्यानंतर सदरील पात्र लाभार्थ्यांची माहिती ऑनलाईन तसेच ऑफलाइन पद्धतीने आयुक्त, समाज कल्याण, पुणे / सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे PSU द्वारे सादर करण्यात येईल.<br>(iv) पात्र लाभार्थ्यांची यादी, नाव, फोटो व लिंग तसेच नाव, बँक खाते, आधार क्रमांक, बीपीएल कार्ड क्रमांक इ.तपशीलवार माहिती आयुक्तालयामार्फत वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात येईल.<br>(v) तक्रार निवारण, अभिप्राय इ. सेवा प्रदान करण्यासाठी विभागाद्वारे स्वतंत्र यंत्रणा तयार करण्यात येईल. (IVR System, Toll free क्रमांक इ.)</td><td>परिशिष्ट - १<br>मार्गदर्शक तत्वे :-<br>(i) नोंदणीकृत लाभार्थ्यांची कागदपत्रे तपासणी, आधार प्रमाणीकरण, हमीपत्र, बँक लिंकेज इत्यादी तपासून पात्र लाभार्थ्यांचा डाटा ऑनलाइन पद्धतीने व कागदपत्रे ऑफलाईन पद्धतीने संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांचेकडून जतन करण्यात येईल.<br>(ii), (iii) व (iv) वगळण्यात येत आहे.<br>(v) तक्रार निवारण, अभिप्राय इ. सेवा प्रदान करण्यासाठी आयुक्त, समाजकल्याण, पुणे उपाययोजना करतील.</td></tr>
<tr><td>८.</td><td>परिशिष्ट - २<br>सहाय्य प्रदान करण्यासाठी मार्गदर्शक तत्वे :-<br>(a) आयुक्त, समाज कल्याण, पुणे हे जिल्हास्तरीय अंमलबजावणी समितीद्वारे संभाव्य लाभार्थ्यांची ओळख/शहानिशा करून</td><td>परिशिष्ट - २<br>सहाय्य प्रदान करण्यासाठी मार्गदर्शक तत्वे:-<br>(a) जिल्हाधिकारी/महानगरपालिका आयुक्त, हे त्यांच्या अध्यक्षतेखालील समितीद्वारे संभाव्य लाभार्थ्यांची ओळख/शहानिशा करून घेतील</td></tr>
</table>

| | | |
|---|---|---|
| | घेईल आणि योजनेअंतर्गत नमूद केलेल्या सर्व मार्गदर्शक तत्वे / अटी इत्यादीची खात्री केल्यानंतर लाभार्थ्यांची यादी अंतिम करेल. | आणि योजनेअंतर्गत नमूद केलेल्या सर्व मार्गदर्शक तत्वे / अटी इत्यादीची खात्री केल्यानंतर लाभार्थ्यांची यादी अंतिम करतील. |
| | (b) CPSU द्वारे लाभार्थ्यांकडून सदरील प्राप्त रक्कम नेमून दिलेल्या प्रयोजनाकरिता वापरण्यात येईल असे स्वयंघोषणापत्र प्राप्त करून घ्यावे व राष्ट्रीय योजनेचा / केंद्र पुरस्कृत समकक्ष योजनेचा लाभ घेतला नसल्याचे देखील त्यात नमूद करून घ्यावे. | (b) जिल्हाधिकारी/महानगरपालिका आयुक्त, यांच्या अध्यक्षतेखालील समिती लाभार्थ्यांकडून सदरील प्राप्त रक्कम नेमून दिलेल्या प्रयोजनाकरिता वापरण्यात येईल असे स्वयंघोषणापत्र प्राप्त करून घेईल व राष्ट्रीय योजनेचा / केंद्र पुरस्कृत समकक्ष योजनेचा लाभ घेतला नसल्याचे देखील त्यात नमूद करेल. |
| | (c) योजनेच्या अंमलबजावणीची तपासणी करण्याचा अधिकार सामाजिक न्याय विभागास असेल. | (c) योजनेच्या अंमलबजावणीची तपासणी करण्याचा अधिकार आयुक्त, समाजकल्याण, पुणे / सामाजिक न्याय विभागास असेल. |
| | (d) योजनेअंतर्गत प्राप्त निधीसाठी स्वतंत्र खाते उघडण्यात येईल. तसेच, योजनेअंतर्गत कार्यान्वित होण्यासाठी निधी स्वतंत्र बँक खात्यात ठेवला जाऊ शकतो. | (d) योजनेअंतर्गत प्राप्त निधीसाठी स्वतंत्र खाते आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्या स्तरावर उघडण्यात येईल. त्यानुषंगाने आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांना स्वाक्षरीचे प्राधिकार असतील. |
| | (e) पात्र लाभार्थ्यांना D.B.T. द्वारे रक्कम प्रदान करण्यात येईल.तसेच, अखर्चिक रक्कम, D.B.T. मधील अडचणींमुळे लाभार्थ्यांच्या खात्यात जमा न झालेली रक्कम विभागाच्या खात्यात जमा करण्यात येईल. | (e) पात्र लाभार्थ्यांना D.B.T. द्वारे आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्यामार्फत रक्कम प्रदान करण्यात येईल. तांत्रिक व इतर अडचणींमुळे पात्र लाभार्थ्यांच्या खात्यात जमा न झालेली रक्कम शासन निर्णयातील तरतूदीनुसार तपासणीअंती लाभार्थ्यांच्या बँक खात्यात जमा करण्याबाबत नियमानुसार योग्य ती कार्यवाही करण्यात येईल. |
| | (f) आर्थिक वर्षाचे खाते आर्थिक वर्ष संपल्यानंतर सहा महिन्यांच्या आत किंवा पुढील मंजुरी यापैकी जे आधी असेल, जे उपयोगिता प्रमाणपत्र आणि अंमलबजावणी यंत्रणेच्या सक्षम अधिकाऱ्याने स्वाक्षरी केलेल्या लेखा परिक्षित खात्यांद्वारे प्रस्तुत केले जातील. | (f) खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक वर्ष संपल्यानंतर सहा महिन्यांच्या आत किंवा पुढील मंजुरी यापैकी जे आधी असेल, त्याप्रमाणे शासनास सादर करण्यात येईल. |

| अ. क्र. | शासन निर्णय दि. ११ मार्च, २०२४ मधील नमूद निकष | सुधारीत निकष |
|---|---|---|
| १. | सबब, सदर योजनेकरिताचे नवीन स्वतंत्र पोर्टल कार्यान्वित होईपर्यंत या योजनेअंतर्गत निधीचे वितरण पात्र लाभार्थ्यांच्या वैयक्तिक आधार संलग्न बँकेच्या बचत खात्यात एकवेळ एकरकमी ऑनलाईन पद्धतीने करण्याऐवजी निधीचे वितरण पात्र लाभार्थ्यांना थेट धनादेशाद्वारे एकवेळ एकरकमी रुपये ३०००/- च्या मर्यादेत ऑफलाईन पद्धतीने वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. | या योजनेअंतर्गत निधीचे वितरण पात्र लाभार्थ्यांच्या वैयक्तिक आधार संलग्न बँकेच्या बचत खात्यात एकवेळ एकरकमी रु. ३०००/- च्या मर्यादेत ऑनलाईन पध्दतीने थेट लाभ हस्तांतरण (DBT) द्वारे आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांच्याकडून करण्यात येईल. |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०८१९१८००४२८२२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SATISH M KHAIRMODE

Digitally signed by SATISH M KHAIRMODE
DN: CN = SATISH M KHAIRMODE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT
Date: 2024.08.19 18:16:11 +05'30'

**( सतीश खैरमोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
६. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/सदस्य,महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
११. मा.प्रधान सचिव, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानमंडळ, मुंबई
१२. मा. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर
१३. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर
१४. सर्व विभागीय आयुक्त
१५. आयुक्त, समाजकल्याण, पुणे

१६. सर्व पोलीस आयुक्त
१७. सर्व आयुक्त, महानगरपालिका
१८. जिल्हाधिकारी (सर्व)
१९. सर्व पोलीस अधीक्षक
२०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
२१. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक
२२. राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक
२३. सर्व प्रादेशिक उपायुक्त (समाजकल्याण विभाग)
२४. सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
२५. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
२६. सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद
२७. निवड नस्ती, सामासु

**********